सध्या सुरू असलेली धारावी पुनर्विकास
प्रकल्पाची निविदा प्रक्रिया रद्द करुन नव्याने
निविदा मागविण्याबाबत ..

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक. धापुप्रा-२०२०/प्र.क्र.८२ /झोपसू**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ०५ नोव्हेंबर, २०२०.

**वाचा :-** १) शासन निर्णय क्र. : धापुप्र-२०१८/प्र.क्र.९०/झोपसु, दिनांक, ५ नोव्हेंबर,२०१८
२) मा. मंत्रिमंडळाचा दि. २९ ऑक्टोबर,२०२० रोजीचा निर्णय.

**प्रस्तावना :-**

धारावीचा एकत्रित सर्वंकष पुनर्विकास करण्याबाबत दि. ४/२/२००४ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. ही योजना **"धारावी पुनर्विकास प्रकल्प"** म्हणून ओळखली जाते. सन २००५ (सेक्टर-१ ते ४) आणि सन २००९ (सेक्टर-५) मध्ये नगर विकास विभागाने धारावी झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाची (झोपुप्रा), "विशेष नियोजन प्राधिकरण" (Special Planning Authority- SPA) म्हणून नियुक्ती केली आहे.

धारावी पुनर्विकास प्रकल्पास विशेष प्रकल्पाचा दर्जा देऊन धारावी पुनर्विकास प्रकल्पाची अंमलबजावणी करण्यासाठी दि. २८ नोव्हेंबर, २०१८ रोजी निविदा मागविण्यात आल्या. दि. १६जानेवारी, २०१९ रोजी प्राप्त झालेल्या २ निविदादारांच्या निविदा दि. १६ जानेवारी, २०१९ रोजी निविदा उघडण्यात येऊन, दोन्ही निविदादारांच्या निविदा सचिव समितीपुढे ठेवण्यात आल्या.

तथापि, धारावी पुनर्विकास प्रकल्पात रेल्वेच्या जागेच्या हस्तांतरणाबाबत दि. ०३ मार्च, २०१९ रोजी झालेल्या सामंजस्य करारातील सविस्तर अटी व शर्तींचा निविदेमध्ये समावेश नसल्याने आणि रेल्वेचा जागेचा समावेश निविदा प्रक्रियेच्या पश्चात केल्यामुळे, दि. १७ जून, २०१९ रोजी सचिव समितीने यशस्वी निविदादाराबाबत निर्णय घेण्यापूर्वी रेल्वेचा जागेच्या हस्तांतरणामुळे निविदा प्रक्रियेत भौतिक बदल (Material Change) झाला आहे किंवा नाही ? याबाबत मा. महाधिवक्ता, महाराष्ट्र राज्य यांचे अभिप्राय घेण्याचा निर्णय घेण्यात आला होता.

मा.महाधिवक्ता, महाराष्ट्र राज्य यांचे दिनांक ०४ नोव्हेंबर,२०१९ रोजी चे रेल्वेच्या जागेसंबंधीचे अभिप्राय व याबाबत दिनांक २७ ऑगस्ट, २०२० रोजी मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील सचिव समितीने मा.महाधिवक्ता, महाराष्ट्र राज्य यांनी दिलेल्या अभिप्रायाबाबत सविस्तर चर्चा केल्यानंतर सचिव समितीने सद्या सुरु धारावी पुनर्विकास प्रकल्पाची निविदा रद्द करण्याची व फेर दुरूस्तीसह नव्याने सुधारित निविदा मागविण्याचा तसेच सदर प्रक्रियेस मा. मंत्रिमंडळाची मान्यता घेण्याचा निर्णय घेतला होता. त्यानुसार मा. मंत्रिमंडळाने दि. २९.१०.२०२० रोजीच्या बैठकी मध्ये सचिव समितीचा निर्णय कायम केला आहे. सबब, धारावी पुनर्विकास प्रकल्पाची सध्या सुरू असलेली निविदा प्रक्रिया रद्द करून फेर दुरूस्तीसह नव्याने निविदा मागविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>** :-

मा. मंत्रिमंडळाच्या दि. २९ ऑक्टोबर, २०२० रोजीच्या निर्णयानुसार सध्या सुरु असलेली धारावी पुनर्विकास प्रकल्पाची निविदा रद्द करण्यात येत आहे.

तसेच, निविदेच्या अटी व शर्ती मध्ये आवश्यक त्या दुरूस्त्या करून नव्याने निविदा मागविण्याचा निर्णय घेण्यात येत आहे. तरी, त्यानुसार मुख्य कार्यकारी अधिकारी तथा विशेष कार्यकारी अधिकारी, धारावी पुर्नविकास प्रकल्प, झोपडपट्टी पुर्नवसन प्राधिकरण, मुंबई यांनी पुढील कार्यवाही करावी.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२०११०५१७१६०५५५०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Suhas Madhav Mamdapurkar

Digitally signed by Suhas Madhav Mamdapurkar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Housing Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=15e9cd7730234dc2963eb61397dd04240c15d02a5a148c43a83593ac725fd19c, serialNumber=f1b00e7181536eedd7b08803397fed3a96870ca795c4d9384b72f43a5a066d99, cn=Suhas Madhav Mamdapurkar
Date: 2020.11.05 17:18:59 +05'30'

**( सुहास ममदापूरकर )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२) मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३) मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/विधारपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५) मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६) मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७) सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व मा.संसद सदस्य
८) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
९) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
११) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
१२) महाअधिवक्ता, मुंबई उच्च न्यायालय, मुंबई.
१३) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
१४) मुंबई महानगर प्रदेशातील सर्व महानगरपालिका आयुक्त,
१५) महानगर आयुक्त, मुंबई महानगर व प्रदेश विकास प्राधिकरण, वांद्रे (पूर्व), मुंबई
१६) उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे(पूर्व), मुंबई-५१
१७) मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, मुंबई

१८) मुख्य कार्यकारी अधिकारी तथा विशेष कार्यकारी अधिकारी,धारावी पुर्नविकास प्रकल्प, झोपडपट्टी पुर्नवसन प्राधिकरण, मुंबई-५१

१९) जिल्हाधिकारी, मुंबई शहर/मुंबई उपनगरे जिल्हा

२०) अपर जिल्हाधिकारी (अति/निष्का) मुंबई शहर/पश्चिम उपनगर/पूर्व उपनगरे

२१) मुख्य अधिकारी, मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१

२२) सह सचिव/उप सचिव/सर्व अवर सचिव/ सर्व कक्ष अधिकारी, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई

२३) निवड नस्ती (झोपसू).